**प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (पाणी व्यवस्थापन पुरक बाबी) घटकासाठी आयुक्त (कृषी) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (बीडीएस) वितरीत केलेला रु.१६३२ लक्ष निधी परत घेण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सुसिंयो- ०६१८/प्र.क्र.१९१/१८/१४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०००३२

तारीख: १४ फेब्रुवारी, २०१९

**वाचा**

१) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.
२) कृषि व पदुम विभागाचे पत्र क्र.०३१८/प्र.क्र.८१/१४-अे, दि.२ एप्रिल, २०१८
३) केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.१७-२/२०१८-आरएफएस-III, दि.१० एप्रिल, २०१८.
४) कृषि व पदुम विभागाचे पत्र क्र.०४१८/प्र.क्र.१११/१४-अे, दि. ११ एप्रिल, २०१८.
५) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.०४१८/प्र.क्र.१५५/१४-अे, दि.२७ एप्रिल, २०१८
६) केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.१८-१२/२०१८-आरएफएस-III, दि.२९ मे, २०१८ (तीन पत्रे).
७) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय सुसिंयो- ०६१८/प्र.क्र.१९१/१८/१४अे, दि.१९ जुन, २०१८.
८) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय सुसिंयो- ०६१८/प्र.क्र.१९१/१८/१४अे, दि.३० जुलै, २०१८.
९) कृषि व पदुम विभागाचे शासन शुध्दीपत्र क्र. सुसिंयो- ०६१८/प्र.क्र.१९१/१८/१४अे, दि.३ नोव्हेंबर, २०१८.
१०) कृषि व पदुम विभागाचे शासन शुध्दीपत्र क्र.०६१८/प्र.क्र.१९१/१८/१४अे, दि.२२ जोनवारी, २०१९.
११) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंच्या राज्यस्तरीय मान्यता समितीच्या दि.२८ जानेवारी, २०१९ च्या बैठकीचे कार्यवृत्त.

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाने दि.१० एप्रिल, २०१८ च्या पत्रान्वये सन २०१८-१९ वर्षासाठी प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पीक घटकासाठी केंद्र हिस्स्याचा रु.४८००० लक्ष नियतव्यय मंजूर करुन सुक्ष्म सिंचनासाठी रु.४०००० लक्ष व पाणी व्यवस्थापन पुरक बाबींसाठी (Supplementary Water Management Activities) रु.८००० लक्ष खर्च करण्याचे सुचित केले आहे. सदर निधीतून निर्माण करण्यात येणारे जलस्त्रोत सुक्ष्म सिंचनाशी संलग्न असणे आवश्यक असल्याचे कळविले आहे. त्याचप्रमाणे, संदर्भाधीन दि.२९ मे, २०१८ च्या पत्रान्वये, केंद्र हिस्स्याचा रु.९८०० लक्ष निधी वितरीत केला आहे. त्यामध्ये सुक्ष्म सिंचनासाठी रु.८१६८ लक्ष व पाणी व्यवस्थापन पुरक बाबीसाठी रु.१६३२ लक्ष निधीचा समावेश आहे.

केंद्र शासनाने कळविलेल्या नियतव्ययानुसार, सुक्ष्म सिंचनासाठी रु.६५६०८ लक्ष (केंद्र हिस्सा रु.४०००० लक्ष व आवश्यक समरुप राज्य हिस्सा रु.२५६०८ लक्ष) व पुरक पाणी व्यवस्थापन बाबीसाठी रु.१३३३३ लक्ष (केंद्र हिस्सा रु.८००० लक्ष व राज्य हिस्सा रु.५३३३ लक्ष) अशा एकूण रु.७८९४१ लक्ष निधीच्या कार्यक्रमास दि.१९ जुन, २०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देऊन केंद्र हिस्स्याचा सर्वसाधारण प्रवर्गाचा रु.७६४४ लक्ष निधी (सुक्ष्म सिंचन रु.६३७१ लक्ष व पाणी व्यवस्थापन पुरक बाबी रु.१२७३ लक्ष) वितरीत करण्यात आला आहे. दि.३० जुलै, २०१८ च्या शासन निर्णयान्वये, अनुसूचित जाती प्रवर्गाचा रु.११७६ लक्ष

(सुक्ष्म सिंचन रु.९८० लक्ष व पाणी व्यवस्थापन पुरक बाबी रु.१९६ लक्ष) व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा रु.९८० लक्ष (सुक्ष्म सिंचन रु.८१७ लक्ष व पाणी व्यवस्थापन पुरक बाबी रु.१६३ लक्ष) असा एकूण रु.२१५६ लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे.

प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेच्या राज्यस्तरीय मान्यता समितीच्या (SLSC) दि.२८ जानेवारी, २०१९ रोजी झालेल्या बैठकीत, प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत, पुरक पाणी व्यवस्थापन बाबीसाठी (Supplementary Water Management Activities) सन २०१८-१९ या वर्षात मृद व जलसंधारण विभागाकडून निधी उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार, दि.१९ जुन,२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत पाणी व्यवस्थापन पुरक बाबीसाठी सर्वसाधारण प्रवर्गासाठी वितरीत केलेला रु.१२७३ लक्ष व दि.३० जुलै, २०१८ च्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी वितरीत केलेला रु.३५९ लक्ष असा एकूण रु.१६३२ लक्ष निधी अर्थसंकल्पीय व्यवस्थापन प्रणालीवरुन (बीडीएस) परत घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :</u>**

१. दि.१९ जुन, २०१८ च्या शासन निर्णयान्वये, प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत पुरक पाणी व्यवस्थापन बाबीसाठी सर्वसाधारण प्रवर्गासाठी वितरीत केलेला रु.१२७३ लक्ष (अक्षरी रुपये बारा कोटी त्र्याहत्तर लाख फक्त) व अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी दि.३० जुलै, २०१८ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला रु.३५९ लक्ष (अक्षरी रु. तीन कोटी एकोणसाठ लक्ष फक्त) असा एकूण रु.१६३२ लक्ष (अक्षरी रुपये सोळा कोटी बत्तीस लक्ष फक्त) निधी अर्थसंकल्पीय व्यवस्थापन प्रणालीवरुन परत घेण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय व्यवस्थापन प्रणालीवरुन परत घेण्यातबाबतची आवश्यक कार्यवाही अर्थसंकल्प कार्यासनाकडून (कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई) करण्यात यावी.

३. मृद व जलसंधारण विभागाने प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पीक (पुरक पाणी व्यवस्थापन बाबी) यासाठी केंद्र शासनाने वितरीत केलेला निधी त्यास आवश्यक समरुप राज्य हिस्स्याच्या निधीसह आयुक्त (कृषी) यांना बीडीएस प्रणालीवर वितरीत करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१५१२११०२९९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2019.02.15 12:12:54 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (कृषी व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री (कृषी व पणन) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (कृषी) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.

४) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (जलसंधारण व रोजगार हमी योजना), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) सचिव (ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) आयुक्त (कृषी),कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) जिल्हाधिकारी (सर्व)
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
११) मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
१२) संशोधन संचालक, महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी
१३) संशोधन संचालक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी
१४) संशोधन संचालक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली
१५) संशोधन संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला
१६) सर्व संचालक, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
१७) संचालक, कृषी हवामान शास्त्र विभाग, पुणे.
१८) भारतीय हवामान शास्त्र विभाग, पुणे.
१९) विभाग प्रमुख, एकात्मिक जल व्यवस्थापन, महात्मा फुले कृषी विद्यापिठ, राहुरी
२०) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, महात्मा फुले कृषी विद्यापिठ, राहुरी
२१) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापिठ, परभणी
२२) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, डॉ बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापिठ, दापोली
२३) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापिठ, अकोला
२४) सर्व विभागीय कृषी सहसंचालक
२५) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)
२६) सर्व कृषी विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषी अधिकारी/सर्व तालुका कृषी अधिकारी/
२७) सर्व मंडळ कृषी अधिकारी
२८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
३०) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
३१) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
३२) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
३३) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर
३४) उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण /नाशिक /पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर
३५) सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
३६) निवडनस्ती.